**विशेष प्रसिद्धी मोहिमेंतर्गत एअर पोर्ट कॅबस् गाड्यांवर करण्यात आलेल्या जाहिरातीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक कौविउ-२०१७/प्र.क्र.५९/अभियान-१**
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१७.

वाचा : १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७/०४/२०१५.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव यांचे पत्र क्रमांक प्रद.वि.प्र.मो./२०१६/का-६/१३७, दिनांक ३०/०९/२०१६.
३) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग पत्र क्रमांक कौविउवि-२०१५/प्र.क्र.१५६/अभियान-१, दिनांक ०७/१०/२०१६.
४) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग ज्ञापन क्रमांक कौविउवि-२०१६/प्र.क्र.१११/अभियान-१, दिनांक ०१/०३/२०१७.

**प्रस्तावना :**

राज्य शासनाच्या वतीने माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत विविध प्रसिध्दी माध्यमांद्वारा विशेष प्रसिध्दी मोहिम राबविण्यात आली होती. त्यानुसार राज्यातील रेडिओ चॅनल्स, बेस्ट बसेसमध्ये एल.ई.डी.स्क्रीन जाहिरात, बेस्ट बसेसच्या साईड व बॅक पॅनलवरील जाहिरात, एस.टी. स्थानकांवर एल.ई.डी.स्क्रिनद्वारे जाहिरात तसेच एअर पोर्ट कॅबस् गाड्यांवर जाहिरात प्रसारित करण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने ९४ एअर पोर्ट कॅबस् गाड्यांच्या बॅक, राईट साईड व लेफ्ट साईडवर या विभागाच्या विविध योजनांबाबत प्रसारित करण्यात आलेल्या जाहिरातींची पूर्तता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य शासनाच्या वतीने राबविण्यात आलेल्या विशेष प्रसिध्दी मोहिमअंतर्गत कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या विविध योजनांबाबत माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत Cash Ur Drive Marketing Pvt. Ltd., Mumbai यांनी दिनांक ३१/१२/२०१६ ते दिनांक ०७/०१/२०१७ या कालावधीत राज्यातील ९४ एअर पोर्ट कॅबस् गाड्यांच्या बॅक, राईट साईड व लेफ्ट साईडवर जाहिरात प्रसारीत केल्याबाबत सादर केलेले **रुपये २,०१,२५०/- (रुपये दोन लक्ष एक हजार दोनशे पन्नास फक्त)** इतक्या रक्कमेचे देयक सन २०१६-१७ या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधीतून अदा करण्यासाठी होणाऱ्या खर्चास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | संस्थेचे नांव | देयक क्रमांक व दिनांक | देयकाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | Cash Ur Drive Marketing Pvt. Ltd., Mumbai-५९. | क्र.THT०४०३, दिनांक १६/०१/२०१७ | २,०१,२५०/- |
| | **एकूण** | | **२,०१,२५०/-** |

२. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये यापूर्वी करण्यात आलेला नाही.

३. या बाबींवर होणारा खर्च सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानांतर्गत मागणी क्रमांक झेडए-१, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (०८) प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान (२२३०६११८) या लेखाशिर्षाखाली मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. राज्यात कौशल्य विकास कार्यक्रमाचे प्रभावी नियोजन व अंमलबजावणी करण्यासाठी सोसायटी नोंदणी अधिनियम, १८६० अन्वये महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीची स्थापना करण्यात आली आहे. तसेच सदर अभियानाकरिता आवश्यक निधी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांमार्फत ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या उप लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात येतो. त्यानुसार विभागाकडून सदर लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित झालेल्या निधीच्या ८०% निधी कौशल्य विकास प्रशिक्षणाच्या कार्यक्रमाकरिता वापरण्याच्या दृष्टीने सदर लेखाशिर्षाखालील तपशिलवार उपशिर्षामधील निधी पुनर्विनियोजनाद्वारे ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) यामध्ये पुनर्विनियोजनाने वळता करुन महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करण्यात आलेली आहे. त्यानुसार २६-जाहिरात व प्रसिध्दी व इतर उपलेखाशिर्षाखालील ८०% उपलब्ध निधी ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) यामध्ये पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यासाठी विभागाने दिनांक ०१/०३/२०१७ रोजी ज्ञापन निर्गमित केले आहे.

५. त्यानुसार उपरोक्त विशेष प्रसिद्धी मोहिमेंतर्गत आलेल्या **रुपये २,०१,२५०/- (रुपये दोन लक्ष एक हजार दोनशे पन्नास फक्त)** इतक्या खर्चाच्या देयकांची पूर्तता मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी हे संबंधितांना विहित मार्गाने करतील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये निर्गमित केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अ.क्र.८, नियम क्रमांक १७ अनुसार जाहिरातींवरील खर्च करण्यास प्रशासनिक विभागास असलेल्या वित्तीय अधिकारांना वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३११८३२५५७७०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S.G. Patil

Digitally signed by S.G. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SDED, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f64f9296da4ba15d02d3ad3826a21a74ed080355ac04eef5617c3b4f08af47ae, cn=S.G. Patil
Date: 2017.03.31 18:34:48 +05'30'

**(सं.गि.पाटील)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
२. उप सचिव, रोस्वरो-२, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. कक्ष अधिकारी, व्यय-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, कफ परेड, मुंबई,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे,
१०. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
११. निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. निवड नस्ती.